"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे."

ही सृष्टी अतिविशाल आहे. त्यातील दूरवरच्या ताऱ्यांचा प्रकाश जमिनीपर्यंत पोहचण्यासाठी करोडो वर्षांचा कालावधी लागतो. प्रकाशाचा वेग जरी सेकंदाला तीन लाख कि.मी.चा आहे तरी अवकाशातील ताऱ्यांचा प्रकाश पृथ्वीपर्यंत पोहचवण्यासाठी करोडो वर्ष लागतात. अशी ही महानतम सृष्टी आपोआप बनलेली नाही. तसेच सृष्टीतील कोणतीच गोष्ट आपोआप बनत नाही. या सृष्टीला आणि त्यातील सर्व वस्तूंना एका शक्तीने बनविलेले आहे. आणि ती महानतम व श्रेष्ठतम शक्ती अल्लाह आहे.

या सृष्टीची अवर्णनीय अशी व्यवस्था आहे. सृष्टीतील एका कणापासून ते महान ग्रहापर्यंत सर्व एका नियमात आणि व्यवस्थेत बध्द आहेत. सृष्टीतील प्रत्येक गोष्टीत आपणास एक सुनियोजितता दिसते. हे या गोष्टीचा स्पष्ट पुरावा आहे की या सृष्टीचा एक शासनकर्ता आहे जो या सृष्टीची व्यवस्था सुनियोजितपणे आणि बुध्दीविवेकाने करीत आहे. तो सृष्टीचा शासक आणि मालक एकमेव अल्लाह आहे. वास्तविकता ही आहे की ही महानतम सृष्टी ईशविरहित नाही की तिचे अनेकानेक ईश्वरसुध्दा नाहीत. एकच एक अल्लाह या महानतम सृष्टीचा मालक, पालक, चालक आणि शासक आहे आणि सृष्टीतील कणाकणावर त्याचाच हुकूम आहे.

हाच अल्लाह सर्व मानवजातीचासुध्दा मालक, पालक, नियंता आणि शासक आहे. तोच आम्हा सर्वांवर कृपाप्रसादांचा वर्षाव करणारा आहे. आमचे शरीर आमच्या शरीराचे अवयव, आमची कुवत आणि पात्रता तसेच जमिनीतील आणि जमिनी बाहेरील, समुद्रतळातील आणि वातावरणातील उपलब्ध तमाम कृपा प्रसाद अल्लाहचे निर्मित आहेत. तोच सूर्योदय करतो, हवा चालवतो आणि पाऊस पाडणारा तोच आहे. त्याने जर पाऊस पाडला नाही तर आम्हाला पाण्याचा एक थेंबसुध्दा मिळणार नाही. त्याने ठरविले तर अमाप पाऊस पाडून पाणीच पाणी चहूकडे करून टाकतो आणि अशा स्थितीत आम्हाला जगणे कठीण होऊन बसते. आम्ही पाण्याचे एक एक थेंब आणि धान्याचा एक एक कण तसेच जीवनावश्यक प्रत्येक वस्तुंसाठी आणि आपल्या प्रत्येक श्वासासाठी अल्लाहचे आश्रित आहोत. ज्या कुणाला व राष्ट्राला जे काही मिळते त्याच्या देण्यामुळेच मिळते आणि त्याच्या न देण्यामुळे काहीच मिळत नाही.

वस्तुस्थिती ही आहे की अल्लाहने मनुष्याच्या प्रत्येक आवश्यकतेची निकड ओळखून त्याची व्यवस्था करून ठेवली आहे. परंतु मनुष्याची सर्वात मोठी आणि अत्यावश्यक गरज ही आहे की त्याला जीवनाचा सरळमार्ग प्राप्त व्हावा आणि असफल जीवनापासून मनुष्याची सुटका व्हावी. जीवनाच्या सरळमार्गावर चालून मनुष्याने आपले जीवन सफल बनवावे. अल्लाहने ज्या असंख्य देणग्या जीवनात मनुष्याला बहाल

केलेल्या आहेत त्यांचा योग्य वापर पध्दतीने मनुष्य अवगत व्हावा आणि त्याने जाणून घ्यावे की त्यांच्या अस्तित्वाचा मूळ हेतू कोणता आहे. मनुष्याने आपल्या जीवनध्येयाला पूर्ण जाणून घ्यावे. मनुष्याला अशी जीवनशैली अपेक्षित आहे की ज्यामध्ये प्रत्येक जाती-वंश, प्रत्येक देशासाठी, प्रत्येक वर्गासाठी समान संधी उपलब्ध असतील आणि प्रत्येकाच्या वित्त, जीव आणि इज्ज़तीची रक्षा केली जाईल. त्या आदर्श जीवनपध्दतीने मानवी जीवनाच्या संपूर्ण समस्यांचे निराकरण होत असावे. त्या जीवनपध्दतीमध्ये प्रत्येकासाठी न्याय व समान संधी उपलब्ध असतील. अशा आदर्श आणि परिपूर्ण जीवनपध्दतीमध्ये मनुष्याला ईशपरायण आणि चारित्र्यवान बनविण्याची क्षमता आणि प्रशिक्षणाची शाश्वत व्यवस्था असेल. त्यात धनसंपत्तीची आणि जीवनावश्यक वस्तूंचे समान व न्याय वाटपाची शाश्वत व्यवस्था असेल. अशा सरळ जीवनमार्गावर चालून मनुष्य एक जबाबदार आदर्श नागरिक, ईशपरायण मनुष्य बनतो. तसेच आदर्श शासन व्यवस्था आणि आंतराष्ट्रीय सलोखा आणि बंधुभाव निर्माण होऊन विश्व शांती नांदू लागते. जीवनाच्या या सरळमार्गावर चालून मनुष्य अल्लाहला प्रसन्न करतो. ज्याच्या हातात आमचे लौकिक आणि पारलौकिक दोन्ही जीवन अवलंबून आहेत, तोच अल्लाह आमचा मालक, पालक, चालक आणि शासक आहे.

जीवनाचा सरळमार्ग प्राप्त करणे मनुष्याची अत्यावश्यक निकड आहे. ही मूलभूत गरज पूर्ण झाली नाही तर मनुष्याने कितीही भौतिक प्रगती केली तरी त्याचा सर्वनाश ठरलेलाच आहे. आज जगात याची प्रचिती येत आहे. जगात मनुष्यनिर्मित दुसरा कोणताही जीवनमार्ग या मूलभूत गरजेला पूर्ण करू शकलेला नाही. जगात असा जीवनमार्ग अथवा जीवनपध्दती उपलब्ध नाही ज्यामुळे जीवनाच्या समस्त समस्यांचे निराकरण होऊ शकेल. कम्युनिझम फक्त पोटापुरते पाहतो आणि आज कम्युनिझम असफल ठरला आहे. लोकशाही एक राजकीय व्यवस्था आहे आणि असफल राजकीय व्यवस्था आहे. संपूर्ण जीवनव्यवस्था लोकशाही देऊ शकत नाही. जगातील कोणतीच व्यवस्था अथवा जीवनशैली मनुष्याच्या जीवनाच्या संपूर्ण समस्यांचे निराकरण करू शकतच नाही. साम्यवाद आणि साम्राज्यवाद दोन्ही मानवी समस्यांची परिपूर्ण उकल मुळीच सिध्द झालेले नाहीत. साम्यवाद, लोकशाहीवाद, साम्राज्यवाद, भांडवलशाहीवाद हे सर्व वाद आज निष्फळ ठरलेले आहेत.

अल्लाहने मनुष्याच्या सर्व गरजांची पूर्तता केलेली आहे आणि त्यानेच मनुष्याच्या या अति महत्त्वाच्या आवश्यकतेची (ईशमार्गदर्शन) सुध्दा पूर्तता केलेली आहे. अल्लाहने प्रत्येक काळात आणि प्रत्येक राष्ट्रात आपले पैगंबर जे उत्कृष्ठ मानव होते त्यांना मनुष्याच्या मार्गदर्शनासाठी पाठविले. या पैगंबरांवर अल्लाहने आपले

मार्गदर्शन अवतरित केलेले आहे. पैगंबरांकरवी अल्लाहने मानवासाठी आदर्श व परिपूर्ण जीवनप्रणाली अवतरित केली आहे. अल्लाहच्या सर्व पैगंबरांनी समस्त मानवजातीला फक्त आणि फक्त एकच ईश्वराची म्हणजे अल्लाहची भक्ती करण्याची आणि अल्लाहचेच आज्ञापालन करण्याची शिकवण दिली. त्याने पैगंबरांद्वारे अवतरित केलेल्या जीवनपध्दतीला स्वीकारून त्यानुसार आचरण करण्याची शिकवण दिली. तसेच जगात इतर दुसऱ्या जीवनपध्दतीला न स्वीकारण्याची व त्यानुसार आज्ञापालन न करण्याची ताकीद दिली. अल्लाहच्या सर्व पैगंबरांनी समस्त मानवजातीला दाखवून दिले की अल्लाहने अवतरित केलेल्या परिपूर्ण मार्गदर्शनाचा मनुष्याने पूर्णतः स्वीकार केला आणि त्यानुसार आपले जीवनाचरण केले तर मनुष्य या लौकिक जगात सफल तर होणारच परंतु पारलौकिक जीवनाचे शाश्वत साफल्य आणि मुक्ती त्याला प्राप्त होईल.

दुष्ट, अत्याचारी आणि दुराचारी लोकांनी अल्लाहच्या सर्व पैगंबरांची अवज्ञा आणि प्रखर अवहेलना केली. याव्यतिरिक्त अल्लाहची ही परिपूर्ण व आदर्श जीवनपध्दती (इस्लाम) चा प्रसार जगात होत राहिला आहे. या दुष्ट व दुराचारी लोकांनी पैगंबरांच्या मृत्युपश्चात अल्लाहच्या या आदर्श जीवनपध्दतीत (मार्गदर्शनात) ढवळाढवळ केली. त्या अत्याचारी लोकांनी पैगंबरांनंतर अल्लाहच्या मार्गदर्शनाला विद्रुप स्वरूप देऊन टाकले आणि त्यात बिघाड निर्माण केला. परिणामतः आज जगात अनेकानेक मानवनिर्मित धर्म बोकाळले आहेत आणि ते सर्व आपापसात संघर्षरत आहेत. आज जगात धर्माच्या नावाने चहूकडे अत्याचार व अन्याय माजला आहे. अल्लाहने याव्यतिरिक्त काळानुरूप जगात बिघाड दूर करून त्याजागी निर्माण कार्य करण्यासाठी आपले पैगंबर पाठविले होते. सर्व पैगंबर त्या काळापुरते आणि देशा व वंशापुरतेच असत. त्या सर्व पैगंबरांचे मार्गदर्शन मर्यादित स्वरुपाचे होते. परंतु शेवटी अल्लाहने आदरणीय मुहम्मद (स.) यांना आपला अंतिम पैगंबर नियुक्त केले. पैगंबर मुहम्मद (स.) अरब देशातील मक्का या शहरात जरी जन्माला आले तरी अल्लाहने प्रलयापर्यंत समस्त मानवजातीसाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांना मार्गदर्शक बनविले. अल्लाहने आपल्या मूळ मार्गदर्शनाला (ज्याला इतिहासांत दुराचारी आणि दुष्ट लोकांनी विद्रुप केले होते) अंतिमतः परिपूर्ण स्थितीत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरित केले. इतिहासात याच परिपूर्ण ईशमार्गदर्शनाला (जीवनपध्दतीला) सर्व पैगंबरांकरवी अल्लाहने जगात अवतरित केले होते. आता अल्लाहचा हाच परिपूर्ण धर्म इस्लाम (जीवनपध्दती) समस्त मानवांसाठी प्रलयापर्यंत राहणार आहे.

अल्लाहचा हा दीन (जीवनप्रणाली) म्हणजेच इस्लाम आपल्या मूळ स्वरूपात दिव्य कुरआन आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या हदीससंग्रहामध्ये सुरक्षित आहे.

परंतु जगातील दुसऱ्या सर्व धर्मग्रंथामध्ये फेरबदल करण्यात आलेले आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे पवित्र जीवन व पवित्र जीवनाचे पूर्ण व्यवहार तपशीलवार आज मूळ स्वरुपात सुरक्षित आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवन आणि जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रातील त्यांचे आचरण समस्त मानवांसाठी प्रलयापर्यंत आदर्श आहे. परंतु जगातील इतर कोणत्याही श्रेष्ठ पुरुष अथवा संत पुरुषाचे जीवन चरित्र पूर्णत: सुरक्षित राहिलेले नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दुराचारी आणि मार्गभ्रष्ट लोकांमध्ये सुधारणा केली आणि त्यांच्यातूनच एक आदर्श समाजनिर्मिती केली. तसेच एक आदर्श राज्यनिर्मिती करून अजोड क्रांती घडविली. पैगंबर मुहम्मद (स.) यांचा या सर्व जीवनव्यवहाराचा पूर्ण तपशील सुरक्षित आहे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कुरआन प्रकाशात निर्मित आदर्श समाज, आदर्श राज्य आणि आदर्श क्रांती समस्त मानवजातीसाठी जगाच्या अंतापर्यंत आदर्श प्रमाण आहे. मानवी इतिहासात अशाप्रकारचा आदर्श समाज, आदर्श राज्य आणि आदर्श क्रांती आणि त्यांचा पूर्ण तपशील दुसरीकडे उपलब्ध नाही. मानवजातीवर अल्लाहचे अमाप उपकार आहेत की आज आमच्याजवळ अल्लाहचा दीन (इस्लाम) त्याच्या मूळ स्वरूपात उपलब्ध आहे. इस्लाम मानवी जीवनव्यवहाराच्या प्रत्येक क्षेत्रासाठी पूर्ण मार्गदर्शन आहे. मनुष्य जीवनाच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक, कौटुंबिक, आंतरराष्ट्रीय इ. सर्व क्षेत्रांत योग्य मार्गदर्शन फक्त इस्लाम करू शकतो. जीवनाच्या या निरनिराळ्या क्षेत्रांतील समस्यांना सोडविण्यासाठी आजतागायत साम्यवाद, लोकशाहीवाद, साम्राज्यवाद, भांडवलशाहीवाद इ. सर्व वाद निष्फळ ठरले आहेत. इस्लाम मानवी जीवनाच्या सर्व समस्यांचे निराकरण सहजतेने करतो. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे पवित्र जीवन तसेच त्यांच्या साथीदारांचे (सहाबी) जीवन, चार आदर्श खलीफांचे राजकीय व्यवस्थापन एक आदर्श नमुना म्हणून जगापुढे आहे. आम्ही या सर्व प्रकाशात प्रकाशमान होऊन स्वत:ला प्रशिक्षित करून आणि आपल्या समाजाची सुधारणा करून मानवी समस्यांची सोडवणूक सहजतेने करू शकतो. आम्ही हा अल्लाहचा दीन इस्लामचा पूर्ण स्वीकार करून आजच्या प्रगत विश्वात जलदगतीने पुढे जाऊ शकतो. कारण इस्लाम बुध्दीविवेकावर आधारित अशी एक परिपूर्ण जीवनशैली आहे. इस्लामजवळ बुध्दीकौशल्य मौलिक महत्त्वाचे आहे आणि बुध्दीविवेकाच्या विरुध्द कोणतीही गोष्ट इस्लामला स्वीकार्य नाही.

इस्लामचे ध्येय फक्त आपल्या अनुयायीं आणि समस्त मानवजातीच्या लौकिक कल्याणापुरतेच मर्यादित नाही तर अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करून शाश्वत पारलौकिक जीवन साफल्य आहे. पारलौकिक जीवनातील शाश्वत शिक्षेपासून बचाव करण्यासाठी मुक्ती मार्ग म्हणजे इस्लाम आहे. आम्हा सर्वांना कधी न कधी मरावयाचे आहे आणि

मेल्यानंतर त्या अल्लाहसमोर हजर व्हायचे आहे ज्याने आम्हाला जगात पाठविले आहे. सर्व मानव अशा प्रकारे मृत्यू पावणार आहेत आणि एके दिवशी ही सृष्टी नष्ट होणार आहे. नंतर पुन्हा अल्लाह नष्ट झालेल्या सृष्टीचे पुनर्निर्माण करेल. ही पुन:निर्मित सृष्टी शाश्वत स्वरूपाची असेल. अल्लाह समस्त मानवजातीला पुन्हा निर्माण करील आणि त्यांचे हे जीवन शाश्वत असेल. अल्लाहचे न्यायालय तेव्हा स्थापित होईल. दुष्ट व दुराचारी लोकांना त्यांच्या अत्याचाराची आणि दुराचाराची योग्य शिक्षा मिळेल जी जगात मिळणे अशक्य आहे. सदाचारी आणि आज्ञाधारक लोकांना त्यांच्या आज्ञाधारकेचा आणि सदाचाराचा योग्य मोबदला मिळेल. जगात हा योग्य मोबदला मिळत नाही आणि मिळणे अशक्य आहे. सर्व मानवांना अल्लाहच्या न्यायालयात हजर केले जाईल. अल्लाहच्या हिशेबापासून कोणीही वाचू शकणार नाही. मनुष्याच्या जीवनाचे सर्व रेकॉर्ड अल्लाहसमोर हजर केले जाईल. मनुष्य आपल्या कानाने आपले संवाद ऐकेल. स्वत:च्या डोळ्याने आपल्या कर्मांना पाहील. मनुष्याचे संपूर्ण जीवन अल्लाहसमोर आणि त्या सर्वांसमोर असेल ज्यास तो नकार देऊ शकणार नाही. ज्या जमिनीवर मनुष्य जीवनभर धावपळ करीत होता ती जमीन त्याच्यासमोर अल्लाहच्या न्यायालयात सर्व काही उगळेल. मनुष्याच्या शरीरातील सर्व अवयव मनुष्याच्या एक एक कृत्याबद्दल साक्ष देतील. न्यायालयात न्यायाधीशाच्या सिंहासनावर खुद्द अल्लाह स्थानापन्न असेल. अल्लाहच्या नजरेतून मनुष्याचे क्षुल्लक कृत्यसुध्दा त्या वेळी सुटणार नाही. तिथे खोटी साक्ष चालणार नाही. त्या ठिकाणी सर्वांना आपली काळजी असेल. सगे सोयरे, मित्र, पती, पत्नी, मुले कोणीही कामी येणार नाही. तिथे फक्त अल्लाह आणि मनुष्य असेल. अल्लाहसमोर मनुष्याला एक एक कृत्याचा हिशेब द्यावाच लागेल.

अल्लाहच्या न्यायालयात जर सिध्द झाले की मनुष्य जगात फक्त आणि फक्त अल्लाहचा आज्ञाधारक होता आणि जीवनात अल्लाहची आज्ञाधारकता त्याने स्वीकारली होती. तो सदाचाराला स्वीकारून दुराचारापासून दूर राहिला. मानवी हक्कांना अदा करणारा आणि मनुष्याशी न्यायनिष्ठेने आणि आदराने वागणारा, अत्याचाराला, उपद्रवाला कुकर्मांना नष्ट करणारा तसेच जगात न्यायाला व सत्याला तो प्रस्थापित करणारा होता. जगात हे सर्व तो मनुष्य अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी आणि पारलौकिक जीवनात मुक्ती प्राप्त करण्यासाठीच करत होता. अशा माणसासाठी अल्लाहच्या न्यायालयात त्याला स्वर्गप्राप्तीचा निर्णय दिला जाईल. तो त्या शाश्वत जीवनात शाश्वत मोबदला प्राप्त करत राहील. स्वर्गात त्याला सर्व काही मिळेल जो तो इच्छिल आणि मनात आणील. याशिवाय त्याला तो उत्कृष्ठ मोबदलासुध्दा दिला जाईल ज्याला कोणत्याही कानाने ऐकले नसेल की डोळ्याने पाहिले नसेल, तसेच कोणत्याही

मनात त्याविषयीचा विचार आला नसेल. अल्लाह अशा माणसाशी कायमचाच प्रसन्न होईल. अल्लाह त्या माणसाशी संवाद करील आणि त्याला आपले दर्शन देईल. हे आहे शाश्वत स्वर्गाचे जीवन!

याविरुध्द अल्लाहच्या न्यायालयात हे सिध्द झाले की मनुष्य अल्लाहचा द्रोही होता, कृतघ्न होता. त्याने जगात अल्लाहव्यतिरिक्त इतर अनेकांची पूजाअर्चा व भक्ती केली आणि आज्ञाधारकता पत्करली. अल्लाहने दाखवून दिलेल्या जीवनाच्या सरळमार्गावरच न चालता तसेच अल्लाहची आज्ञाधारकता न स्वीकारता मनुष्य आपल्या इच्छा आकांक्षेच्या आहारी गेला. त्याने आपल्यासारख्या माणसांची गुलामी पत्करली व त्यांचेच आदेश पाळत राहिला. सदाचाराऐवजी दुराचाराचा अवलंब केला. अल्लाहच्या आदेशांची अवहेलना व अवज्ञा केली. त्याने इतरांवर अत्याचार केला आणि जगात उपद्रव व दुराचाराला फैलावत राहिला. अशा उपद्रवी, अत्याचारी व अन्यायी माणसासाठी अल्लाहच्या न्यायालयाचा निकाल त्या मनुष्याच्या विरोधी जाईल. त्या माणसाला शाश्वत नरकयातना भोगण्याची शिक्षा दिली जाईल. त्याला नरकाग्नीत फेकले जाईल. तिथे अतिभयानक यातना त्याला दिली जाईल. नरकाग्नी जगातील अग्नीपेक्षा सत्तर पटीने जास्त भयानक असेल. परंतु मनुष्य अग्नीत भस्म होऊन मरणार नाही. त्वचा जळेल परंतु लगेच दुसरी त्वचा येईल. मांस जळेल दुसरे येईल, हाड भस्म होईल त्या जागी लगेच दुसरे येईल. मनुष्य अशा प्रकारे जळतच राहील, जळतच राहील. तहानेने व्याकुळ झाल्यावर त्याला उकळते पाणी प्यायला दिले जाईल. त्यामुळे त्याचे ओठ, गळा आणि आतडे जळतील. खाण्यासाठी अति विषारी आणि काटेरी खाद्य दिले जाईल, ज्याची कल्पना मनुष्य करूच शकत नाही. अशा प्रकारच्या दुसऱ्या अनेक यातना त्याला दिल्या जातील. हे शाश्वत चालतच राहील. अल्लाहला जगात नाकारल्यामुळे आणि जगात उपद्रव, दुराचार, अत्याचार आणि अन्याय माजविल्यामुळे त्या माणसाला ही नरकाग्नीची शाश्वत शिक्षा मिळेल.

वास्तविकता ही आहे की जगाच्या सफलतेबरोबर किंबहुना यापेक्षा अति महत्त्वाचे म्हणजे पारलौकिक जीवन साफल्यप्राप्तीसाठी आणि नरकाग्नीपासून वाचण्यासाठी जगात सतत प्रयत्नशील राहिले पाहिजे आणि यासाठी एकमेव मार्ग, अद्वितीय मार्ग अल्लाहचा दीन (जीवनपध्दती) इस्लामला आपल्या जीवनव्यवहारात पूर्णपणे आचरणात आणणे आहे. अल्लाहशी प्रार्थना आहे की या महान कार्यासाठी अल्लाहने आम्हाला उभे करावे. आम्हा सर्वांना सरळमार्गावर चालण्याची प्रेरणा द्यावी. (आमीन)

-०- समाप्त -०-